मॅन्ग्रोव्ह ट्रेनिंग अॅन्ड रिसर्च सेंटर, ठाणे उभारणी कामाच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - एस -१०/२०२५/प्र.क्र.१४२/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १२/०६/२०२५.

वाचा :

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक २०/०९/२०१९ च्या शासन निर्णयातील भाग एक उप विभाग-५ परि.क्र.१३४(१), १३४(२),१३४ (३) मधील तरतुदी
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५/०९/२०१९
३) शासनपत्र क्र.एस-१०/२०१५/प्र.क्र.२१९/भाग-२/फ-३, दिनांक २३/०९/२०२४ रोजीचे महाराष्ट्र कांदळवन व सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठान नियामक मंडळाच्या सातव्या बैठकीचे इतिवृत्त.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) यांचे पत्र क्र. कक्ष-२४/लेखा/ प्र.क्र. ४५/८८६/२०२४-२५, दिनांक १३/०३/२०२५.
५) मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई यांचे क्र. मुअ (को)/प्रशा/इमारती /का-२(१)/५५६,टी.ए. क्र.१४६/२०२४-२५, दि. ७/०२/२०२५ रोजीची तांत्रिक मान्यता.

प्रस्तावना-

वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत मुंबई ट्रान्सहार्बर लिंक रोड, शिवडी-न्हावा सागरी सेतू करिता ४७.४१७ हे. वनक्षेत्र वळतीकरण करण्यात आले आहे. सदर वळतीकरणाबाबतच्या केंद्र शासनाच्या तत्वत: मंजूरी आदेशात अट क्र. xii नुसार Mangrove and Marine Biodiversity Conservation Plan राबविण्याकामी प्रकल्प यंत्रणेने एकूण रु. ६१.३१ कोटी निधी महाराष्ट्र कांदळवन आणि जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठानास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीतून मॅन्ग्रोव्ह ट्रेनिंग अॅन्ड रिसर्च सेंटर उभारण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते.

सदरच्या प्रस्तावास मा.मंत्री (वने) तथा अध्यक्ष महाराष्ट्र कांदळवन व सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठान यांच्या अध्यक्षतेखाली दि. २/०८/२०२४ रोजी संपन्न झालेल्या महाराष्ट्र कांदळवन व सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठान नियामक मंडळाच्या ७ व्या बैठकीत मंजूरी दिली आहे. सदर प्रस्तावित Mangrove Training and Research Centre बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मौजे नौपाडा, ता. जि. ठाणे सर्व्हे क्र.२२ पै. मधील सुमारे ६५००.०० चौ.फूट क्षेत्राच्या वन विभागाच्या जागेवर महाराष्ट्र कांदळवन आणि जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठानच्या माध्यामातून Mangrove Training and Research Centre बांधण्याबाबतच्या रक्कम रु.११,३५,८६,२४२/- (१८% GST व १% कामगार विम्यासह) व उपबाबींसह एकत्रित गोषवारा रक्कम रु. १४,७९,९९,९००/- (रु. चौदा कोटी एकोणऐंशी लक्ष नव्याण्णव हजार नऊशे फक्त) च्या अंदाजपत्रकास खालील नमूद अटी व शर्तीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.

**प्रकल्प किंमतीचा बाब निहाय तपशील खालीलप्रमाणे :-**

| अ.क्र. | बाब | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | प्रकल्पाचे मुळ कामाची किंमत (Work Portion) | १२,०१,१०,५५२.५१ |
| २ | स्वामित्व धन (Royalty) | ९६,७८१.६२ |
| ३ | साहित्य चाचणी रक्कम (Q.C. Testing Charges ) | २,३८,७३०.०० |
| ४ | वस्तू व सेवाकर (G.S.T. १८%) | २,२४,३९,०९९.०३ |
| ५ | कामगार विमा (Labour Insurance १%) | ८,९९,१२५.०६ |
| ६ | प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार शुल्क (PMC) | ४२,१५,६११.७८ |
| **एकूण** | | **१४,७९,९९,९००/-** |

२. **अटी व शर्ती** -

अ) प्रस्तावानुषंगाने कार्यवाही करताना सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र. बी डी.जी-२०१४/प्र.क्र.९६/इमा-३, दि. ८.०७.२०१४ मध्ये नमूद कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

ब) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी. तसेच नियोजित बांधकाम करताना वन (संरक्षण व संवर्धन) अधिनियम, १९८० च्या तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घ्यावी.

क) मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई यांच्या दि.७/०२/२०२५ रोजीच्या तांत्रिक मान्यता आदेशामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

ड) सदरचे कामकाज करताना वित्त विभाग, नियोजन विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागाव्दारे वेळोवेळी दिलेले निर्देश व सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क्र.-१, दि. १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) महाराष्ट्र कांदळवन आणि सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठानाद्वारे निधी वितरीत करताना, सदर प्रतिष्ठानाच्या नियामक मंडळाद्वारे वेळोवेळी मान्यता घेण्यात यावी.

५) विविध प्राधिकरणे / संस्था यांच्या सहमती प्राप्त करुन घेतेवेळी विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.

सदर अटी व शर्तींची पूर्तता करण्याची व शासन निर्णयातील तरतुदींनुसार उचित कार्यवाही करण्याची संपूर्ण जबाबदारी विभागीय वन अधिकारी,कांदळवन विभाग-उत्तर कोकण यांची राहील.

**३.** वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि. २०/०९/२०१९ च्या शासन निर्णयातील भाग एक उप विभाग-५ परि. क्र.१३४(१),१३४(२),१३४ (३) मधील तरतुदी तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक दि. २५/०९/२०१९ अन्वये स्थापत्य व विद्दुत रु.१५ कोटी रकमेपर्यंत किंमतीच्या कामांना मुख्य अभियंता यांनी (प्रस्तुत प्रकरणी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम यांनी तांत्रिक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार संबंधित उपभोक्ता विभागास देण्यात आल्यानुसार सदर मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**४.** मुंबई ट्रान्सहार्बर लिंक रोड, शिवडी-न्हावा सागरी सेतू करिता ४७.४१७ हे. वनजमीन वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत वळतीकरण करण्यात आले आहे. या मोबदल्यात प्रकल्प यंत्रणेने Mangrove and Marine Biodiversity Conservation Plan करिता महाराष्ट्र कांदळवन आणि सागरी जैवविविधता संवर्धन प्रतिष्ठानाला उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून प्रस्तावित मॅन्ग्रोव्ह ट्रेनिंग ॲन्ड रिसर्च सेंटरसाठी लागणारा उक्त खर्च करण्यात येईल.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६१२१७४०३५६११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=223dbaf509e56a22dd8c9d33c199767837144d5824e7011745d9a521fdbedad3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2025.06.12 17:42:01 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (केंद्रस्थ अधिकारी) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसंकल्प-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) निवडनस्ती